राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता सर्वसाधारण संवर्गाकरीता रू.५१९.९९ लाख इतका निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: योजना ३३१८/प्र.क्र.२००/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-** १) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्राज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक No.12-01/2015, S.D.-I, दिनांक ०९.११.२०१५.

३) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र.१०-२/२०१८-SD.VI, दि.०४ जुन, २०१८.

४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१८/प्र.क्र.१३५/१अे, दिनांक ३१ जुलै, २०१८.

५) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र.१०-२/२०१८-SD.VI, दि.२० नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय योजना आयोगाने नियुक्त केलेल्या बी.के.चतुर्वेदी समितीच्या शिफारशी केंद्र शासनाने स्विकारलेल्या आहेत. त्यास अनुसरून सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये करण्यात आलेली आहे. सन २०१४-१५ पासून सदर पुनर्रचित योजनांमधील काही योजना एकत्रित करून अभियानाच्या स्वरूपात राबविण्याचे केंद्र शासनाने निश्चित केलेले आहे. त्यामध्ये राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) या केंद्र पुरस्कृत अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप-अभियान (एसएमएसपी) राबविण्यात येत आहे.

बियाणे तपासणी प्रयोगशाळा सुधारणे, बियाणे उत्पादन संस्थांना नवीन बियाणे उत्पादन तंत्रज्ञान इ. आत्मसात करण्यासाठी सहाय्य करणे यासाठी दर्जेदार किंवा प्रमाणित बियाण्यांचे उत्पादकतेमध्ये नवनवीन तंत्रज्ञानाचा समावेश करून सध्या अस्तित्वात असलेली योजना एका अभियानाच्या स्वरूपात संवर्धित व विस्तारीत करण्यामुळे शेतकऱ्यांना वाजवी दरामध्ये व ठराविक वेळेमध्ये दर्जेदार बियाण्यांची उपलब्धता होण्यामध्ये सुधारणा करण्याच्या अनुषंगाने सदर उप-अभियान केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात येत आहे. या उप-अभियानाच्या कक्षेत शेतकऱ्यांना प्रमाणित बियाणे पुरवठा करण्यासाठी केंद्रवर्ती बियाणे उत्पादन करण्यापासून बियाणे क्षेत्राच्या विकासासाठी हितावह पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य करणे, नैसर्गिक आपत्तीच्या वेळी बियाण्यांची गरज भागविण्यासाठी बियाणे बँकेत जमा करणे इ. अशी ही संपुर्ण बियाणे साखळी समाविष्ट आहे. या उप-अभियानामध्ये बीज ग्राम कार्यक्रम, तालुका बीजगुणन प्रक्षेत्रांचे बळकटीकरण, प्रमाणित बियाणे उत्पादनास सहाय्य या बाबींचा समावेश आहे.

संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक ०४ जून, २०१८ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने सर्वसाधारण घटकाकरीता केंद्र पुरस्कृत **"ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमाकरीता"** (केंद्र हिस्सा ६० टक्के, राज्य हिस्सा ४० टक्के) रूपये ७०८.७२ लाख आणि ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गत "**प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रमासाठी**" (केंद्र हिस्सा ६० टक्के, राज्य हिस्सा ४० टक्के) रूपये ७१.२७ लाख, अशा प्रमाणात एकूण रू. ७७९.९९ लाख इतका निधी महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला यांना थेट उपलब्ध करून दिलेला आहे. त्याप्रमाणात सर्वसाधारण संवर्गासाठी राज्य हिस्सा **ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमाकरीता** रूपये ४७२.४८ लाख आणि **प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रमाकरीता** रूपये ४७.५१ लाख, असा एकूण रूपये ५१९.९९ लाख आहे.

तसेच, संदर्भ क्रमांक ५ येथील दिनांक २० नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत **"ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम"** रब्बी हंगाम २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता (केंद्र हिस्सा ६० टक्के) सर्वसाधारण शेतकऱ्यांकरीता रूपये ४२२.०० लाख उपलब्ध करून दिलेले आहेत. त्याप्रमाणात राज्य हिस्सा (४० टक्के) रू.२८१.३३ लाख इतका होत आहे.

सद्यस्थितीत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेतील "**ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम**" आणि ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गत "**प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रम**" सन २०१८-१९ मध्ये केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० या प्रमाणात राबविण्याकरीता **सर्वसाधारण घटकासाठी** राज्य हिस्सा रूपये रू. ५१९.९९ लाख इतकी तरतुद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेतील "**ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम**" आणि ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गत "**प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रम**" सन २०१८-१९ मध्ये केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० प्रमाणे राबविण्यासाठी सर्वसाधारण घटकासाठी लेखाशीर्ष २४०१ ए१५४ अन्वये उपलब्ध तरतुदीपैकी राज्य हिस्सा **ग्राम बीजोत्पादन कार्यक्रमाकरीता** रूपये ४७२.४८ लाख आणि **प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रमाकरीता** रूपये ४७.५१ लाख मिळून **रू. ५१९.९९ लाख इतकी तरतुद** महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला यांना वितरीत करण्यात येत आहे. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३-२४०१, पिक संवर्धन, १०३, बी-बियाणे,
(००)(२७) कृषि उन्नती योजना- बियाणे लागवड व साहित्य उप-अभियान,
(केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० टक्के),
(सर्वसाधारण) (२४०१ ए१५४) योजनेंतर्गत ३३- अर्थसाहाय्य.

**सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

२. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ व दिनांक २७.०७.२०१८ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९९/२०१८/व्यय-१, दिनांक ०३/१२/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१४१५१३२५४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2018.12.14 15:17:42 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
७. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
९. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
१२. उप सचिव (२-अे) , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.उप सचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.